**महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास कर्जरोख्याद्वारे रु.४२५ कोटी इतका निधी उभारण्यासाठी शासन हमी मंजुरीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक:- शाहमी-२०१०/सा.बां.वि/प्र.क्र. ३/अर्थबळ.
**दिनांक :- १६ फेब्रुवारी, २०१०.**

**वाचा :** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/शासन हमी, दि ५/११/१९९९,
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. हमी-१०.००/प्र.क्र.१४/शासन हमी, दि.१४/९/२०००,
३) शा.नि.वि.वि.शाहमी-१००८/प्र.क्र.१८/शासन हमी, दि.२८/४/२००८,
४) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई यांचे क्रमांक-एमएसआरडीसी-०१/वित्त/४३० (एस अॅण्ड एफअे)/व्हीओएल-ii,दिनांक १२/१०/२००९.
५) सा.बां.वि. यांचा अनौपचारिक प्रस्ताव क्रमांक-खाक्षेस-२००९/प्र.क्र.११२/एलबी/रस्ते-८ व रस्ते-६, दिनांक ३/२/२०१०.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला सन २००९-२०१० मध्ये बांद्रा वरळी सागरी सेतू प्रकल्पासाठी शक्तीप्रदान समितीच्या दिनांक २७/११/२००९ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार दाराशॉं अॅन्ड कंपनी प्रा.लि. मुंबई यांचेमार्फत रु.४२५कोटी (रुपये चारशे पंचवीस कोटी फक्त) इतक्या कमाल रकमेचे कर्जरोखे रु.१०.२५% (वार्षिक व्याजदर ०.६३८% Low coupon समावेशासह) दराने उभारणीकरिता शासन हमी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला सन २००९-२०१० मध्ये बांद्रा वरळी सागरी सेतू प्रकल्पासाठी रु.४२५ कोटीपर्यंतचे (रुपये चारशे पंचवीस कोटी फक्त ) कर्जरोखे उभारणीकरिता खालील अटींच्या अधिन राहून शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

(अ) कर्जरोखे विक्रीसाठी बाजारात काढल्यानंतर रु.४२५ कोटी किंवा प्रत्यक्ष जेवढा निधी उभा राहील यापैकी जी कमी रक्कम असेल ती व त्यावरील व्याज यासाठी देण्यात येत असलेल्या शासन हमीसाठी हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून प्रतिशत प्रतिवर्ष रु.४/- या दराने हमीशुल्क लागू राहील.

(ब) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई हे Principal Debtor राहतील. सदर शासन हमीची मुदत १० वर्षे वैध राहील. रु.४२५ कोटींच्या रोख्यांची दहा वर्षाच्या अखेरीस व्याजासह रु.१०८४,५१,५६,७००/- किंवा प्रत्यक्ष उभारलेले कर्जरोखे व त्या अनुषंगाचे व्याज इतकी परतफेड देय राहील.

**( कृ. मा. प. )**

(क) हे हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (total maximum outstanding amount) देय राहील. हमीशुल्काच्या परिगणनेसाठी, महिन्यातील १५ दिवसापेक्षा कमी दिवस वगळण्यात यावेत आणि १५ दिवस किंवा त्यापेक्षा अधिक दिवसांचा कालावधी पूर्ण महिना म्हणून धरण्यात यावा. हमी मंजूर केलेल्या शासन निर्णयाचा दिनांक आणि कर्जरोख्याची प्रत्यक्ष उभारणी यामध्ये मंदनअवधी (Time Lag ) असला तरी हमीशुल्क, हमी दिल्याच्या दिनांकापासून उपरोक्त कार्यपध्दतीनुसार भरावे.

(ड) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तिय वर्षाच्या ३१ मार्च आणि / अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

(इ) देय हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम थकीत हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जून्या थकीत हमी शुल्काची वसुली, त्यानंतर त्यापेक्षा कमी जून्या हमीशुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

(ई) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महामंडळाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

(प) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांनी शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क"या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याबाबतच्या संनियंत्रणाची जबाबदारी उप सचिव, (रस्ते-६) सा.बां.विभाग यांची राहील.

(फ) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची सांक्षाकित प्रत सा.बां.वि.ने वित्त विभागास सापेक्षाने पाठवावी.

(भ) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांनी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क सा.बां.वि. त्या महामंडळास देय असणा-या अनुदानातून वळती करुन शासनाकडे भरणा करेल किंवा महामंडळाकडून वसूल करेल.

(म) कर्जरोख्यानुसार उभारलेल्या रकमेचा विनियोग त्याच प्रयोजनासाठी करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई / सा.बां.वि. यांची राहील.

(य) राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई हे या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक रकमेचे कर्जरोखे उभारणार नाही.

(र) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई हे विहित मुदतीअंती कर्जरोख्याच्या व्याजासह परतफेडीत कसूर करणार नाही. कसूर केल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

(ल) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडून सदर कर्जरोख्यांच्या परतफेडीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय संबंधित संस्थेला हमीपूर्ततेकरीता शासन हमीची प्रतिपुर्ती म्हणून वापर करता येणार नाही. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांची चल / अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन, वसुलीचा निर्णय झाल्यास, त्यावेळी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, सा.बां.वि. व वित्त विभाग यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा.

वरील (अ) ते (ल) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

२. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई समवेत कर्जरोखे घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सा.बां.विभागातील संबंधित उप सचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय सा.बां.वि. यांचा अनौपचारिक प्रस्ताव क्रमांक- खाक्षेस-२००९/प्र.क्र.११२/ एलबी/रस्ते-८ व रस्ते-६,दिनांक ३/२/२०१० अन्वये प्रस्ताविलेल्या सहमतीने व वित्त विभागाचा शासन हमी क्रमांक-५/ २००९-२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक **क्रमांक- २०१००२१६१३२७००००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( मीनल पेडणेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२) व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मर्या. मुंबई, प्रियदर्शनी पार्क, नेपियनसी रोड, मुंबई-४०० ०३६.
३) वित्त विभाग (साउ /ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/ व्यय-११ ) मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) दाराशाँ अ‍ॅन्ड कंपनी प्रा.लि. मुंबई, १२०५-०६/रिजन चेंबर, २०८, नरिमन पाईंट, मुंबई - २१.
९) निवड नस्ती - अर्थबळ.

1